उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक या पदाच्या सन २०१७ मधील बदल्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१७ (८९/१७)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ३१ मे, २०१७.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ३(१) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक या संवर्गातील खालील प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांनी सध्या कार्यरत असलेल्या ठिकाणी विहित कालावधीपेक्षा जास्त कालावधी व्यतीत केला असल्याने सदर प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांच्या खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदलीचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. रवी चोपडे | विभागीय सहसंचालक कार्यालय, पुणे | संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे | प्रशासकीय |

प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल.

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित कार्यालय प्रमुखांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबधित कार्यालय प्रमुखांनी बदली झालेल्या प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांनी पर्यायी प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या प्रशासन अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे.
२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त **दिनांक ३०.०६.२०१७** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक **हे** बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या कार्यालयाने काढावे. **दिनांक ०१.०७.२०१७** पासूनचे वेतन बदलीपूर्वीच्या कार्यरत असलेल्या कार्यालयातून काढण्यात आल्यास त्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील बदली झालेले प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक **हे** कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **दिनांक ०१.०७.२०१७** पूर्वी शासनास सादर करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०५३११०४८०४३७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha P Kini

Digitally signed by Manisha P Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha P Kini
Date: 2017.05.31 15:20:41 +05'30'

**(म.प्र.किणी)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी यांची कार्यालये
६. संबंधित प्रबंधक/कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक
७. निवड नस्ती.

**प्रत :-** १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव